**अतिवृष्टीमुळे आलेला पूर, जमिनीचे भूस्खलन किंवा जमिनीला मोठमोठया भेगा पडणे, डोंगर खचणे किंवा दरडी कोसळणे इ. कारणांमुळे बाधित तसेच या आपत्तीप्रवण गावांचे पुनर्वसन व नागरी सुविधा पुरविण्याच्या अनुषंगाने दि. १४ ऑक्टोंबर, २०२२ रोजी निर्गमित केलेल्या शासन निर्णयामध्ये " भूकंप " या नैसर्गिक आपत्तीचा समावेश करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन शुध्दिपत्रक क्र. लाभूपु-३१२४/५८/प्र.क्र.४५/र-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक:- २८ जून, २०२४

<u>संदर्भ</u>:- १) शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग, क्र. जीटीएन-१०८३/२१७/र-१२, दि.१०/२/१९८३
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. सीएलएस-११-०५/प्र.क्र.२३९/म-३, दि.९/१/२००६
३) शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्र. प्रआयो-२०१७/प्रक्र.३४८/योजना-१० दि.१६/२/२०१८
४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एफएलडी-२०१९/प्र.क्र.१२९/र-१२, दि.१४/१०/२०२२
५) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. सीएलएस-२०२२/प्र.क्र.३४९/म-३, दि.२७/३/२०२३

**<u>प्रस्तावना:-</u>**

अतिवृष्टीमुळे आलेला पूर, जमिनीचे भूस्खलन किंवा जमिनीला मोठमोठ्या भेगा पडणे, डोंगर खचणे किवा दरडी कोसळणे इ. नैसर्गिक आपत्तींमध्ये घरांची पडझड होणे, नागरी सुविधांवर परिणाम होणे यामुळे सार्वजनिक मालमत्तेची मोठ्या प्रमाणावर हानी होते. या आपत्तींमुळे ज्या गावांचे / क्षेत्राचे / वाडीचे / तांड्याचे कायमस्वरुपी पुनर्वसन करणे आवश्यक आहे, अशा गावाचे क्षेत्राचे / तांडयाचे / वस्तीचे पुनर्वसन करण्यासंदर्भात सर्वसमावेशक असे धोरण नाही. नैसर्गिक आपत्तीमुळे बाधित गावांचे पुनर्वसन, घरदुरुस्ती, घरांची पुर्नबांधणी, नागरी सुविधा इ. बाबत शासन परिपत्रक क्र. सीटीएन-१०८३/२१७/र-१२, दि.१०/२/१९८३ अन्वये सविस्तर मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या असून त्यामध्ये वेळोवेळी शासन स्तरावर धोरणात्मक निर्णय घेऊन सदर बाधित गावांचे कशाप्रकारे पुनर्वसन करण्यात येईल याबाबतच्या सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. तसेच, यापुर्वी सन २००५ मधील अतिवृष्टीमुळे निर्माण झालेल्या पूर परिस्थितीत बाधित पुरग्रस्त गावांचे पुनर्वसन करण्याबाबत शासनस्तरावर धोरणात्मक निर्णय घेऊन शासन निर्णय दि.९/१/२००६ अन्वये सविस्तर मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. परंतु शासनाचे सदरचे धोरण निश्चित होऊन जवळपास १५ वर्षापेक्षा जास्त कालावधी झालेला असून सध्याची आर्थिक, भौतिक व सामाजिक परिस्थिती तसेच शासनाची प्रचलित धोरणे विचारात घेता, पुरामुळे तसेच इतरही नैसर्गिक आपत्तींमुळे बाधित / आपत्ती प्रवण क्षेत्रातील गावांचे / क्षेत्राचे वाडीचे / तांडयाचे पुनर्वसन करण्याच्या अनुषंगाने फक्त ग्रामीण भागासाठी लागू असेल असे एक सर्वसमावेशक धोरण ठरविण्याकरिता महसूल व वन विभाग, क्र.एफएलडी-२०१९/प्र.क्र.१२९/र-१२, दि.१४/१०/२०२२ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आलेला आहे.

भूकंप पुनर्वसित गावात अंतर्गत रस्ते, बंदिस्त गटारे व इतर मुलभूत नागरी सुविधासंदर्भात संदर्भाधिन क्र. ४ मध्ये नमूद शासन निर्णयात **" भूंकप "** या नैसर्गिक आपत्तीचा समावेश करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती .

महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.सीएलएस-२०२२/प्र.क्र.३४९/म-३, दिनांक २७ मार्च, २०२३ नुसार एकूण १२ नैसर्गिक आपत्तीमध्ये " **भूकंप** " या आपत्तीच्या समावेश असल्याने **" भूकंप "** हा विषय वेगळा नसून **" भूकंप पुनर्वसन "** हा आपत्ती व्यवस्थापनाचा भाग असल्याने याबाबत सामान्य प्रशासन विभागाने धारणा पक्की केली आहे.

**शासन शुध्दिपत्रक :-**

प्रस्तावनेमध्ये नमूद वस्तूस्थितीस अनुलक्षुन संदर्भ क्र. ४ मध्ये नमूद शासन निर्णयामध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे:-

अतिवृष्टीमुळे आलेला पूर, जमिनीचे भूस्खलन किंवा जमिनीला मोठमोठया भेगा पडणे, डोंगर खचणे किंवा दरडी कोसळणे इ. कारणांमुळे बाधित तसेच या आपत्तीप्रवण गावांचे पुनर्वसन व नागरी सुविधा पुरविण्याच्या अनुषंगाने असलेल्या संदर्भाधिन महसूल व वन विभाग,क्र.एफएलडी-२०१९/प्र.क्र.१२९/ र-१२, दि.१४/१०/२०२२ रोजीच्या शासन निर्णयात **" भूंकप "** या नैसर्गिक आपत्तीचा समावेश करुन भूकंप पुनर्वसित गावात अंतर्गत रस्ते, बंदिस्त गटारे व इतर मुलभूत नागरी सुविधा पुरविणे याबाबत उक्त शासन निर्णयातील नमूद अटी/शर्ती च्या अधिन राहून कार्यवाही करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६२८१६०५१८६७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SATYANARAYAN
SHIVPRASAD BAJAJ

Digitally signed by SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=1085617af371f507cb8ee4d914eb645d92480247b61bd58b5c3074ba3a6a62d7, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=F7145AF5949FB706E2DCB06C2B209B58FFA369F6E085E02041722C90F0528791, cn=SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
Date: 2024.06.28 16:16:19 +05'30'

**( सत्यनारायण बजाज )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. विभागीय आयुक्त, कोकण विभाग/पुणे विभाग/नाशिक विभाग/औरंगाबाद विभाग/अमरावती विभाग/नागपूर विभाग.
१०. सर्व जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण.
११. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता-१/२) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर

१३. महालेखापाल (लेखा परीक्षा-१/२) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
१४. संचालक, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मदत व पुनर्वसन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. वित्तीय सल्लागार तथा सहसचिव (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, नवीन प्रशासन भवन,मुंबई.
१६. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
१७. वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-६, मंत्रालय, मुंबई-३२.
१८. महसूल व वन विभाग, कार्यासन ब-१/पी.ए.सी/अ व ज ची सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई.
१९. महसूल व वन विभाग, कार्यासन र-१२
२०. निवडनस्ती कार्यासन र-५, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.